अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्क मान्यता)
अधिनियम २००६ नियम २००८ व सुधारित नियम २०१२ नुसार

# वन कार्ययोजना आराखडा

सामुहिक वनहक्काचे संरक्षण व व्यवस्थापन योजना

## ग्रामसभा- दुधमाळा

**कालावधी**
**(सन 2022-23 ते 2031-32)**



## तालुका - धानोरा
## जिल्हा – गडचिरोली

# ठराव

**ग्रामसभेचे नाव:** दुधमाळा

**ग्राम पंचायतीचे नाव:** दुधमाळा
**तालुक्याचे नाव:** धानोरा
**जिल्हा:** गडचिरोली
**दिनांक:**

**ठराव:**
**क.)** असे घोषित करण्यात येते की, यासोबत जोडलेल्या व्यवस्थापन आराखड्यावर चर्चा झाली आहे आणि सदर व्यवस्थापन आराखडा आजपासून. 10 वर्षे या कालावधीसाठी स्वीकारण्यात आला आहे.
**ख. )** असेही घोषित करण्यात येते की, सोबतचा आराखडा वन विभागाच्या आराखडा / सूक्ष्म आराखडा / चालू आराखडा (Management Plan / Micro Plan / Working Plan) यांच्याशी खालीलप्रमाणे सुसंगत राहिल
**i)** सोबतचा व्यवस्थापन आराखडा यापुढे वन विभागाच्या वनव्यवस्थापन आराखडा / सूक्ष्म आराखडा / चालू आराखडा यामध्ये अंतर्भूत असेल.
**ii)** वन विभागाच्या व्यवस्थापन आराखडा / चालू आराखडा / सूक्ष्म आराखडा यातील या सामूहिक वन संसाधन व्यवस्थापन आराखड्याशी सुसंगत नसलेला भाग यापुढे वगळण्यात आला आहे असे समजण्यात येईल. वन विभागाने विनाविलंब याबाबत खात्री करावी.
**ग.)** सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती यांना या आराखड्याची प्रत स्थानिक जिल्हा वन संरक्षक यांना पाठविण्याबाबत सूचित करण्यात येत आहे.
**घ.)** याद्वारे असेही घोषित करण्यात येते की, ही ग्रामसभा जेंव्हा गरज भासेल तेंव्हा हा व्यवस्थापन आराखडा सुधारीत करणे, तसेच वन विभागाच्या सुक्ष्म / चालू आराखड्यातील भाग सुधारीत करणे याबाबतचा हक्क राखून ठेवत आहे.
**च.)** यानंतर असेही घोषित करण्यात येते की, कोणीही या सामूहिक वनहक्क क्षेत्रामध्ये व्यवस्थापन, वृक्षारोपण, वृक्षतोड आणि वनांचे पुनरुज्जीवन यासारखे उपक्रम या ग्रामसभेच्या पूर्व सूचित परवानगीशिवाय घेणार नाही.



## 1. आमच्या गावाविषयी

### 1.1. प्रस्तावना

इंग्रजांच्या वसाहत काळात तसेच स्वातंत्र्यानंतर वनांच्या एकत्रीकरणात आदिवासी व वनात पिढ्यानपिढ्या वास्तव्य करणाऱ्या जन समुहावर झालेला ऐतिहासिक अन्याय दूर करण्यासाठी करण्यात आलेला भारत सरकारचा कायदा “अनुसुचित जमाती व इतर पंरपंरागत वननिवासी ( वन हक्क मान्य करणे) अधिनीयम 2006 नियम 2008 व सुधारित नियम 2012” नुसार कलम 3(1) नूसार सामुहिक वन हक्क मिळण्याचे अधिकार प्राप्त झाले. यामध्ये अनुसूचित जमाती किंवा इतर पारंपारिक वननिवासी यांना सामुहिक वन हक्कांतर्गत निस्तार सारखे हक्क, गावाचे सिमेंतर्गत किंवा सिमेबाहेर पारंपारिकरित्या गोळा केले जाणारे वन उत्पादन, त्याचा वापर करणे किंवा त्याची विल्हेवाट लावणे यासाठी स्वामित्व हक्क, पाण्यामधील मत्स्य व अन्य उत्पादने, चराई करणे, पारंपारिक मोसमी साधनसंपत्ती मिळविणेइत्यादी हक्क आहेत.

अनुसुचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वन हक्काची मान्यता) अधिनियम 2006 अस्तित्वात आल्यानंतर अनुसुचित जमाती व अन्य पारंपारिक वननिवासी (वन हक्काची मान्यता)नियम 2008 व सुधारित नियम 2012 तयार करण्यात आले.सुधारित नियम 2012 चे नियम 4(1)(च) नुसार अनुसुचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासीं यांच्या फायद्यासाठी अश्या सामुहिक वन संसाधनाचे शाश्वत व समसमान व्यवस्थापन करण्यासाठी सामुहिक वन संपत्तीचे संवर्धन करण्याची व तीचे व्यवस्थापन करण्याची योजना तयार करणाऱ्या वन विभागाच्या सूक्ष्मदर्शक आराखडा किंवा कार्यआयोजना किंवा व्यवस्थापन योजनाबरोबर संवर्धन व व्यवस्थापन योजना समितीला करणे आवश्यक वाटेल अश्या

फेरबदलाविषयी एकत्रीकरण करणाऱ्या खंड (ङ) नुसार गठीत करण्यात आलेल्या समितीचे संनियंत्रक व नियंत्रण करणे अशी जबाबदारी ग्रामसभाना देण्यात आली. कायद्यातील नियम 4(1)(च) च्या तरतूदीनुसार कर्तव्ये पार पाडण्यासाठी ग्रामसभा तिच्या सदस्यामधून नियम 4(1)(ङ) नुसार स्थापन केलेल्या समितीला "सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समिती" (Community Forest Rights Management Committee)असे संबोधण्यात यावे. सदर समितीचे संनियंत्रन व नियंत्रन ग्रामसभा करेल. ग्रामसभेतील सामूहिक वन संपत्तीचे संवर्धन व व्यवस्थापन योजना तयार करणे, नैसर्गिक साधन संपत्तीच्या व्यवस्थापनातून प्राप्त होणारा महसुल तसेच शासनाकडुन प्राप्त होणारा निधी यांचे बँक खात्यामार्फत संनियंत्रण करणे, जमाखर्चाचे लेखे व लेखापरिक्षण ठेवणे इत्यादी प्रशाकीय बाबी पार पाडण्याकरीता सदर समिती ही वनहक्क कायद्याच्या अंमलबजावणीसाठी ग्रामसभेची कार्यकारी समिती असेल.त्यामुळे सामुहिक वन हक्कांतर्गत प्राप्त क्षेत्राचा आराखडा तयार करणेची जबाबदारी ग्रामसभा व ग्रामसभाद्वारे नियुक्त सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समितीस या कायद्याने देण्यात आली आहे.त्यानुसार आराखडा तयार करण्यात आला आहे.

## 1.2 पार्श्वभूमी

कार्याआयोजना तयार करण्याचे उदिष्ट खाली प्रमाणे माडण्याचा प्रयत्न करीत आहे, वन कार्ययोजना वनविभाग करत होते, परंतु पहील्यांदा ग्रामसभा दुधमाळा करीत आहे, व मी कार्य आयोजना प्रशिक्षणार्थी असल्यामुळे ग्रामसभेने माझ्या कडे सोपविले आहे,गडचिरोली जिल्ह्यात धानोरा तालुक्यातील ग्रा.प.दुधमाळा या गावाला, अनुसूचित जमाती व इतर पारंपरिक वननिवासी ( वन हक्क मान्य करणे ) अधिनियम 2006 "या कायदाने, दिनांक ६/५/2013 ला सामुहिक वन हक्क दावा मंजूर झाला ( गावाला सामुहिक पटा मिळाला ), सामुहिक वनहक्क दावा एकुण652:58 हे.आर. मिळाला आहे.वनहक्क कायदा२००६ व पेसा कायदा१९९६ च्या तरतुदी नुसार जल जंगल जमिनीचे सर्व अधिकार ग्रामसभेकडे आलेले आहेत,म्हणून आज कार्य आयोजण्याचे काम ग्रामसभेचे आहे, म्हणून ग्रामसभा दुधमाळा कार्ययोजना बनवत आहे,

वन कार्य आयोजना म्हणजे काय, वन म्हणजे जंगल, कार्य म्हणजे काम आणि योजणा म्हणजे कोणतेही काम करण्यापुर्वी त्याचे भौतिक या गैर भौतिक रुपात त्याचे रुपरेषा तयार करणे म्हणजे योजना होय,टापुचे नाव सीमा व हद्दीत येणारे भौगोलिक क्षेत्रातील प्रत्यक्ष निरीक्षण करून तयार करीत आहे, कार्य आयोजनाच्या कामामध्ये पद्मभुषण श्री माधव गाडगीळ सर श्री विजय एदलाबादकर सर यांचे मोलाचे योगदान आहे, वनहक्क प्राप्त झाल्याने या वनक्षेत्राची व्यवस्थापणाची जबाबदारी ग्रामसभेची आहे, व्यवस्थापनेचे नियोजन वन कार्य आयोजना बनवून करण्यात येते, ग्रामसभा दुधमाळा या वनक्षेत्रात ४(चार)कक्ष आहेत, पण गावातील लोकांना ते समजण्या सारखे नसल्याने पारंपरिक पद्धतीने ओळखल्या जाणाऱ्या निरनिराळ्या भागाना म्हणजे टापुचा आधार मानुन कार्य आयोजना करण्याचे ठरविले आहे, या कार्याआयोजना साठी महत्त्वाचा अभ्यास केले, दि.2ऑक्टोबर2018पासून सामुहिक वनसंपती कार्य आयोजनाचा प्रशिक्षण मेंढा(लेखा)येथे तज्ञांच्या मार्गदर्शना खाली केले,यामध्ये श्री डॉ माधव गाडगीळ सर,श्री विजय एदलाबादकर सर,श्री मोहन भाऊ,श्री देवाजी तोफा, व या प्रशिक्षण कालावधीत इतर ही तज्ञांचे मार्गदर्शन लाभले, यासाठी माझी निवड ग्रामसभेनी केली त्यासाठी ग्रामसभेचे आभार मानतो,त्यामुळे वनहक्क कायदा, पेसा कायदा, जैवविविधता कायदा, रोजगार हमी सारख्या कायदाची माहिती या प्रशिक्षणाच्या माध्यमातून कळली,संमार्ट फोनच्या माध्यमातून जी.पी, एस,द्धारे आपल्या क्षेत्राचा सीमाकंण केले, व वनसंपतीचा अंदाज घेण्यासाठी प्रथम सर्व१९टापुवरील वनसंपतीचे ढोबळ मनाने निरीक्षण करण्यात आले, आणि वनस्पतीचा अंदाज घेण्यात आले, आपल्या जंगलात कोणकोणती वनस्पती आहे व किती प्रमाणात आहे, कोणती वनस्पती नष्ट झाली किंवा कमी झाली याचा अंदाज निरीक्षणाच्या माध्यमातून घेण्यात आले, तसेच जमीनीची धुप थाबण्यासाठी आपल्याला काय करावे लागेल, यासाठी चढ उतार जागेवर दगळी लहान लहान बंधारे बाधुन पाणी अडवून पाणी जिरवुन जमीनीची धूप थाबण्यासाठी प्रयत्न करू, आणि कमी किंवा नष्ट होणाऱ्या जातीचा संरक्षण सवर्धन आणि पुनर लागवड ग्रामसभेच्या माध्यमातून करण्याचा प्रयत्न करु,आणि हे सगळे करण्यासाठी ग्रामसभा दुधमाळा नियम बनवले आहेत, ग्रामसभेचे नियम, वनसंरक्षाचे नियम, गौण वन उपज काढण्यासाठी नियम, रोपवन तयार करण्यासाठी नियम, आणि ज्या ज्या वेळी आवश्यकता वाटेल त्या त्या

वेळी नियम बनवले जातील, व वनाचा संरक्षण सवर्धन करण्याचा प्रयत्न करु,आणि हे सगळे करत असताना वनहक्क कायदा व पेसा कायदाचा आधार घेवु,ग्रामसभेनी बनविली कार्ययोजना वनविभागाला वापरने कायदाने बंदनकारक आहे, म्हणून ग्रामसभा दुधमाळा वन कार्ययोजना बनवत आहे,

**आमची ग्रामसभा**
**ग्रामसभेचे नाव:-** दुधमाळा
**ग्रामपंचायत**: दुधमाळा
**तालुका:** धानोरा
**जिल्हा:** गडचिरोली
**सेन्सस कोड: 538979**
**अ.अक्षांश** : 20.232254N
**ब. रेखांश** : 80.234531E
**जोडपत्र दिनांक:** 05/05/2013

## वनाधिकार अभिलेख (जोडपत्र)

| हक्क | होय/नाही | शेरा |
|---|---|---|
| 1) निस्तार हक्क | होय | निस्तार पत्रका प्रमाणे मान्य |
| 2) गौण वनोत्पादनावरील हक्क | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (ग) प्रमाणे मान्य |
| 3) अन्य सामूहिक हक्क जसे- अ) वापर किंवा हक्कदारी असलेले (जल)<br>ब) चराई ( जंगल) | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (घ) प्रमाणे मान्य |
| 4) जैविक विविधता, बौद्धिक संपत्ती व पारंपरिक ज्ञान यांच्या हक्कांची सुगमता. | होय | जैवविविधता कायद्यानुसार गठीत ग्रामस्तरीय समितीला हक्क |
| 5) अन्य पारंपरिक हक्क. | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (झ) प्रमाणे मान्य |

## 1.3 इतिहास

आताच्या महाराष्ट्र राज्यात आताच्या गडचिरोली जिल्ह्यात धानोरा तालुक्यातील दुधमाळा गाव, या गावात सात आठ जातीचे लोक वास्तव्यातअसून, आता या गावाची लोक संख्या अंदाजे नवशे ते हजार आहे,गावात आता सहा ते सात जातीचे लोक वास्तव करत आहेत. पुर्वी गावामध्ये फक्त आदिवासी (गोंड ) राहात होते, कालांतराने गावामध्ये इतर जातीचे लोक आले, जसे मरार (माळी),खाती,कलार,माहार,चाभार,व इतर जातीचे लोक आले, व अजूनही वास्तव करत आहेत,दुधमाळा गावाचा इतिहास फार पुर्वीचा आहे, दुधमाळा गाव हा जमिदारीचा गाव ह्या जमिदारीत चौदा गाव समाविष्ट आहेत, ह्या जमिदारीचा जमिदार ( राजा )हा आदिवासी (गोंड) असुन मडावी परीवारातला आहे, पिळ्यान पिळ्या वारसा हक्काप्रमाणे त्या घऱ्याण्याला जमिदारी लाभली होती, जरी राजा मरण पावले तरी त्याचा मुलगा किंवा त्याच्या वारसातील जमिदार बणायचा,

पुर्वी दुधमाळा गावात गायी म्हैशी भरपुर प्रमाणात होते, व गायी म्हैशीतुन भरपुर प्रमाणात दुध काढायचे म्हणून या गावाला दुधमाळा असे नाव पडले असावे असे जानकर बुजरूक लोक म्हणतात,पुर्वीपासून दुधमाळा व जमिदारीत आदिवासी लोकांची होती, येथील लोकांचा मुख्य व्यवसाय शेती आहे, शेतीसोबतच वनातले गौण वन उपज जसे मोहफुले ( मोह)चार (चारोळी) टेंभरे,ढिंक, लाख,बांबू हेसुध्दा जमा करायचे, मोह, चार,टेबंरे जमा करून ते पावसाळ्यात खाण्यासाठी उपयोग करायचे,त्याबद्दलात जमिदाराला वार्षिक कर म्हणजे शेतसारा द्यावा लागायचा, पंरतु जंगलातुन केव्हाही कोणतीही वस्तू आणण्यासाठी बंधन नसायचे,सन १९६०/६५सालापासुन लोक जंगलातून बांबू तोडून आणायचे व गडचिरोली येथे विक्रीसाठी बैल बंडीने नेत असायचे, शंभर बांबुला पंचेविस ते तिस रूपये मिळत असे,त्याकाळी जंगलावर गावाचा हक्क असायचा, अगोदर भरपूर प्रमाणात जंगल असल्यामुळे आणि लोक गरजेनुसार आपल्याला जेवढा पाहिजे तेवडाच आणायचे, त्यामुळे जंगलाचा नाश होत नव्हता, कालांतराने वनकायदा आला लोकांचा जंगलावरचा.हक्क कमी होत गेला, वनविभागाचे कर्मचारी लोकांना घरगूती उपयोग साठी लागणारे गौणवन उपज,घरासाठी लागणारे शिवारफाटे, शेतीसाठी लागणारे औजारे हे आणनसाठी लोकावर बंदी घातली, त्यामुळे लोक गरजेपुरते आणायचे ऐवजी गतजे पेक्षा जास्त आणु लागले, त्यामुळे पण वूक्षतोड जास्त प्रमाणात होत गेली. सन 2009/10मध्ये पाऊस फार कमी पडला व धानाचे पीक मरू लागले होते, त्यावेळी गावातील लोकांनी विचार करून काकडवेलीचा नाला आहे त्या नाल्यावर बंधारा साधायचा असा ठरविले, दुसऱ्या दिवसापासून कामाला सुरुवात झाली, कन्हाळगाव (रीठी)क्षेत्रामध्ये नाल्यावर धबधबा या ठिकाणी कच्च्या बंधारा बाधुन पाणी अडवले, तो पाणी पाटाच्या माध्यमातून तलावात टाकणार होते, त्यासाठी पाटाचा खोदकाम करण्यासाठी गावातील प्रत्येक कुटुंबातून एक महिला एक पुरुष येवून कामाला सुरुवात केली, आणि७५%टक्के काम पुर्ण झाले होते,पण ही बातमी वनविभागाला कळली व त्यांनी कामावर येवून काम थांबले, आणि दुधमाळा गावातील महिला व पुरुष यांच्या वर गुन्हा दाखल केले, त्यामुळे तो काम अर्धवट सोडून द्यावा लागला, आणि त्या वर्षी शेतीचा अर्धा पीक पाण्या अभावी गेला.अशा प्रकारे दुधमाव्याचा ईतिहास आहे,

## 1.4 गावाची प्राथमिक माहिती

| गावाचे नाव | दुधमाळा |
|---|---|
| ग्रामपंचायत | दुधमाळा |
| तालुका | धानोरा |
| जिल्हा | गडचिरोली |
| गावातील कुटुंबाची संख्या- 300 | अनुसूचित जमाती(ST)- 140 |
| | अनुसूचित जाती(SC)- 10 |
| | भटक्या जमाती(NT)- 8 |
| | ओबीसी(OBC)- 142 |
| | |
| पुरुष लोकसंख्या | 550 |
| स्त्री लोकसंख्या | 450 |
| एकूण लोकसंख्या | 1000 |

| अनुसूचित जमाती लोकसंख्या | 560 |
|---|---|
| किती टोले आहेत (नावे लिहा) | फासी टोला, गाता पेडी |

## 1.5 गावाची भौगोलिक माहिती

| जमिनीचा वापर | क्षेत्रफळ (हे) |
|---|---|
| डोंगर व जंगल | 250 |
| जंगल | 100 |
| कठाणी नदी | 10 |
| मळेखट | 5 |
| पडीक जमीन | 20 |
| गावठाण | 10 |
| नवा तलाव, सिंदेबोडी, माराई बोडी, टोल्याची बोडी | 10 |
| शेती | 250 |
| काकडवेली नाला | 5 |
| कठाणी नदी | 10 |
| टोल्याची बोडी | 1 |
| माराईबोडी | 1 |
| सिंदेबोडी | 3 |
| नवातलाव | 5 |
| जलसाठ्या मध्ये ग्रामसभेचे दोन मोठे तलाव व दोन लहान बोडी आहेत व खाजगी बोड्या आहेत. | 15 |
| इतर भाजीपाला पिके | 15 |
| वागे | 5 |
| मिरची | 15 |
| मुंग | 10 |
| उडीद | 10 |
| बरबटी | 10 |
| पोपट | 15 |
| कुर्ता | 10 |
| चना | 10 |
| जवस | 50 |
| तुर | 75 |
| धान (भात) | 250 |
| ग्रामसभा दुधमाळाला वन हक्क कायद्या प्रमाणे मिळालेला | 300 |

| हक्क६५८:५२हे.आर.आहे,खालील क्षेत्रात,1)शेती,2)जलसाठा,3)नदीनाले 4)व जंगल समाविष्ट आहे.ग्रामसभा दुधमाळा शेतीचा वापर खरिप व रब्बी दोन्ही हंगामात उत्पादन घेतले जाते, खरिप मध्ये मुख्य पिके धान (भात)चा आहे. | |
|---|---|

## 1.6 गावाची व्यवसाया संबंधी माहिती

| व्यवसाय | कुटुंबाची संख्या |
|---|---|
| शेती | 290 |
| पशुधन | 250 |
| दुधाचा व्यवसाय | 4 |
| वनउपज गोळा करणारी कुटुंब | 300 |

## 1.7 पोलो – निसर्गाशी संबंधित सन

| नाव | वेळ | निसर्ग संपदा |
|---|---|---|
| सोमवार पारनुक पोलो | जेव्हा जेव्हा साथीचे रोग येतात तेव्हा | वर्षभरात जेव्हा साथीचे रोग येतात तेव्हा व अनेक साथीचे रोग येत असतात त्यामुळे ही पोलो पाडली जाते, तसेच गुरेढोराना चौखुरा व साथीचे रोग आले तर या सर्व बिमारी पासुन संरक्षण मिळावा म्हणून सोमवार पारनुकीची पोलो पाडली जाते, आता कोरोना माहामारी या साथीच्या रोगाच्या वेळी आमच्या गावी सोमवार पारनुक पोलो पाडली. |
| डवऱ्या पाण्याची पोलो | पहीला पाऊस पडतो तेव्हा | पहीला पाऊस पडतो तेव्हा सर्व नदी नाले डबके तलाव बोडीत पाणी जातो, तेव्हा पुर्ण पाणी दूषित झाला असतो, गुरेढोरे तेव्हा बाहेचा पाणी पितात, पहिल्या पाऊसामुळे घान व जीव जंतू वाहून तलावात बोडीत जातात, व पुर्ण पाणी दूषित होते, त्यामुळे साथीचे रोग पसरतात, या पासून सुटका मिळावी म्हणून डवऱ्यापाण्याची पोलो केली जाते, निसर्गाला आराधना केली जाते कोबळ्या बकराचा बळी दिला जातो. |
| संजोरी पोलो | दिवाळी, कार्तिक नंतर | संजोरी पोलो ही दिवाळी कार्तिक झाल्यानंतर साजरी केल्या जाते, आपल्या शेतीतून धानाचे पूर्ण पीक निघाले जाते, ठाकूर देवाच्या नावाने संजोरी पोलो करतात, ठाकूर देव शेतीची व पीकाची देखभाल करतो अशी धारणा लोकांची आहे, पिढ्या न पिढ्या परंपरेनुसार ही प्रथा सुरू आहे, कोबळ्या बकराचा बळी देवुन संजोरी पोलो साजरी केली जाते. |
| अळीची पोलो | शनिवारी धान रोवणी झाल्यानंतर | पिकावर निरनिराळे रोग व किडी येतात, आणि हा निसर्गाचा कोप आहे, असे समजून पिकावर कोणत्याही प्रकारचे रोग येवू नये म्हणून अळीची पोलो पाडली जाते. |

| | | |
|---|---|---|
| नवा पोलो | सप्टेंबर महिन्यात | दुधमाळा गाव जमिदारीचा गाव असल्याने जमिदार व भुम्या जाकाई देवीच्या नावाने नवा पोलो करतात, शेतामधुन नवीन पिक येण्याला सुरुवात होते त्यावेळेस भुम्या जाकाई देवी जवळ कोबंळे बकरे याचा बळी देवुन देविला विनंती करते,या वर्षी चागला पिकपाणी होवू दे व त्यानंतर सर्व चौदाही गावातील लोक नवीन धान्य खायला सुरुवात होते, म्हणून या पोलोला नवा पोलो म्हणतात. |
| हाडोक पोलो | सप्टेंबर महिन्यात | धान्याची रोवनी सपली की हाडोक पडतात, हाडोक म्हणजे दुष्काळ असा अर्थ होतो, पुर्वी खूप दुष्काळ पळत असे अपुरे साधनांचा अभावी ते घडत असे, त्यांना संपूर्ण जीवन निसर्गावर अवलंबून राहावे लागायचे, परसळ (देवधान),मोहफुले, चार, टेभंरे व इतर कंदमूळ तेव्हा लोक खात असून आपला उदरनिर्वाह करीत असे, म्हणून निसर्गाला आराध्य मानुन निसर्गाची पुजा करीत असे, ते निसर्गाला सांगत होते की देवा या वर्षी चागला पाऊसपाणी पडू दे भरभरून शेती.व जंगलातील फळे मुळे होवू दे आम्ही तुला विनंती करतो, व कोबंळे बकरे याचा बळी देतो ही परंपरा रीती रीवाज नुसार आजही सुरु आहे. |
| बिजोरी पोलो | जून महिन्यात | पहिला पाऊस पडतो व शेतकरी शेतीच्या कामाला सुरवात करतो, त्यावेळेस गावात बीजोरी पोलो केली जाते, बीजोरी पोलो केल्या नंतर सर्व शेतकरी आप आपल्या शेतात पेरणीला सुरवात करतात. |
| मोहडोबंरी पोलो | मार्च महीन्यात | मोहाच्या झाडाला मार्चच्या सुरवातीला फुले येतात, आणि शिमगा(होळी)सुध्दा या महीन्यात येते, म्हणून शिमग्याला पोलो पाडतात, मोहडोमंरीची पोलो झाल्याशिवाय कोणीही मोहफुले वेचत नाही , |

## गावातील सामुहिक देवस्थान

| अ.क्र. | नाव | स्थान |
|---|---|---|
| 1 | नार माता/ गाव माउली/ माराई | गावात |
| 2 | जाकाई माता | डोंगरात |
| 3 | गोसाई देव देव | जंगलात |
| 4 | ठाकूर देव/चिकाटी/ भूम्याल / तल्लूर मुते | शेतात |
| 5 | महादेव | नदी जवळ |

| 6 | भीम देव | जंगलात |
|---|---|---|
| 7 | बजरंग बली | गावात |
| 8 | बलकी देव | जंगलात |
| 9 | मोठा देव | जंगलात |

## 1.8 संघटन

एक मेका साहय करू अवघे धरु सुपंथ।ह्या मनी प्रमाणे गावात एकोपा राहावा,गाव एकसंघ राहावे,जर गावत संघटना नसेल आणि एकता नसेल त्यागावाचा विकास होत नाही,म्हणून संघटना तयार करणे आवश्यक आहे, म्हणून दुधमाळा ग्रामसभेत संघटनेच्या माध्यमातून समित्या व बचत गट तयार केले. (1) वनहक्क समिती, (2) सनियंत्रण समिती, (3) नियोजन समिती, (4) वन व्यवस्थापन समिती, (5) साधनसंपत्ती नियोजन व व्यवस्थापन समिती, (6) मादक द्रव्य नियंत्रण समिती, (7) ग्रामसभा कोष समिती, (8) शांतता व न्याय समिती, (9) कर्ज नियंत्रण समिती. (10) बाजार समिती, (11) तंटामुक्ती समिती, गावातील महिला बचत गट, शेतकरी बचत गट, युवक मंडळ, या सगळ्यांचा माध्यमातून गाव एकता संघटीत आहे.



## 1.9 इतर ग्रामसभा व महासंघाशी संबंध

आपण निसर्गाकडे पाहून वाटचाल करायला पाहिजे कारण निसर्गाकडून मानवाला बरेच काही शिकायला मिळेल, आपण जेव्हा जंगलात प्रवेश करतो तेव्हा वृक्ष, प्राणी,पक्षी, व मासे सुध्दा समुहाने दिसतात, वाघासारखे एकल पोटे तरी समुहाला घाबरतात, आपण मानुस आहोत, म्हणून ठेकेदार, व्यापारी, दलाल, व राजकारणी या लोकांपासून वाचायचे असेल तर संघपनेची जरुत आहे, संघटना नसेल तर एकता नाही, आणि एकता नसेल तर प्रत्येक मानसाला कोणीतरी फसवणूक करतो, म्हणून संघटना तयार करणे आवश्यक आहे. (1) कोणतेही व्यवाहार करत असताना ग्रामसभा महासंघाशी चर्चा केली जाते, कारण अनेक गावामध्ये ठेकेदारानी एकटे गाव पाहून फसवणूक करून निघून जातो, त्यामुळे इतर गावाचा संघ तयार करून ठेकेदारासोबत व्यवहार केला जातो. (2) कोणतेही गौण उपज गोळा करून महासंघाच्या मदतीने व्यवहार केल्यास मालाला योग्य भाव मिळते व फसवणूक होत नाही. (3) गावातील कोणतेही भांडण तंटे मिटवण्यासाठी पोलीस स्टेशन किंवा न्यायालयाचा दार ठोठावा लागत नाही. (4) एकाद्या गावामध्ये इतर शासकीय अधिकारी बळजबरीने मनमानी करत असेल तर महासंघा मध्ये किंवा इतर चार पाच ग्रामसभा त्याचा निपटारा पुर्ण केला जातो.

## 1.10 गावात असलेल्या सुविधा

गावातील सेवा, सुविधा आणि त्यांचे अंतर खालील प्रमाणे आहे–

| अ.क्र. | सुविधा व यंत्र संसाधन | अंतर |
|---|---|---|
| 1 | प्राथमिक शाळा | गावात |
| 2 | अंगणवाडी | गावात |

| 3 | गट ग्रामपंचायत कार्यालय | गावात |
|---|---|---|
| 4 | आरोग्य उपकेंद्र | गावात |
| 5 | तलाठी कार्यालय | गावात |
| 6 | स्वस्त धान्य दुकान | गावात |
| | पोष्ट ऑफिस | गावात |
| | तालुका | 9 किमी |
| | जिल्हा | 25 किमी |

## 1.11 पशुधन माहिती

| अ.क्र. | पशुधनाचे प्रकार | संख्या |
|---|---|---|
| 1 | गाय- बैल | 400 |
| 2 | म्हैस- रेडे | 10 |
| 3 | शेळी/बकरे | 250 |
| 4 | कोंबडी | 1000 |



## 1.12 कृषी पिके हंगाम माहिती

| अ.क्र. | हंगाम | खरीप (हो/नाही) | रब्बी (हो/नाही) |
|---|---|---|---|
| 1 | धान | हो | हो |
| 2 | भाजीपाला | नाही | हो |
| 3 | तूर | नाही | हो |
| 4 | चना | नाही | हो |
| 5 | मुंग | नाही | हो |
| 6 | जवस | नाही | हो |
| 7 | उळीद | नाही | हो |
| 8 | मका | नाही | हो |
| 9 | शेंगदाणे | नाही | हो |

## 1.13 पावसाची सरासरी

| वर्ष | पाऊस (मी.मी.) |
|---|---|
| 2015 | 848 |
| 2014 | 1266 |
| 2013 | 2368 |
| 2012 | 1568 |
| 2011 | 1214 |
| 2010 | 1769 |
| 2009 | 1124 |

| 2008 | 1272 |
|---|---|
| 2007 | 1874 |
| 2006 | 1564 |
| 2005 | 1682 |
| 2004 | 1315 |

# 2. वन व्यवस्थापन आराखड्याविषयी

## 2.1 उद्देश आणि कृती

| उद्देश | कृती |
|---|---|
| 1) वनाचे संरक्षण करणे:- | 1. वनाचे वनव्यापासुन ऱ्हास थांबवणे.<br>2. निसर्गातून मिळणाऱ्या विविध लाभांना, गौण उपजांना वाढविणे व टिकवून ठेवणे<br>3.आपल्या जंगलातून चोरी होणाऱ्या मालाला रोख लावणे व दंडात्मक कार्यवाही करणे.<br>4.जंगल सौरक्षण साठी गावात नियमावली तयार करणे.<br>5.सीमांकन करणे.<br>6.रोपवाटिका तयार करणे.<br>7.औषधी वनस्पती व चराई साठी चारा तयार करणे.<br>8.वनस्पतींची यादी बनवणे.<br>9.वेगवेगळ्या भुदृश्यांची यादी बनवणे.<br>10.जंगलाचे शाश्वत पद्धतीने वापर करणे.<br>11.वेगवेगळ्या भुदृश्यांची नकाशे तयार करणे.<br>12वनस्पती लागवडी नंतर त्यांची निघा राखणे.<br>13.वृक्षांची दर हेक्टरी संख्येचा अंदाज काढणे. |
| 2) जंगलातील जैवविविधतेचे संरक्षण :- | 1) आपल्या जंगलातील जैवविविधतेचे नुकसान होत असल्यास त्यासाठी कृतिशील असणे.उदा. शिकार, अवैध मासेमारी असे अवैध काम होत असल्यास त्यास प्रतिबंध घालणे.<br>2) नष्ट होणाऱ्या वनस्पतींची कारणासहित नोंद ठेवणे |
| 3) स्थलांतर थांबवणे | 1) गावातील तरुण मुलं गावात काम नाही मिळत म्हणून बाहेर कंपनीमध्ये जातात परंतु ठेकेदाराकडून त्यांची फसवणूक होऊन वापस गावात येतात असे प्रकरण थांबविणे. तसेच<br>2) गावातील लोकांना बाहेर रोजगारासाठी जाण्याची वेळ येऊ नये यासाठी गावातच वर्षभर काम पुरले पाहिजे यासाठी वेळोवेळी रोजगार हमी किंवा इतर योजनेच्या माध्यमातून काम उपलब्ध करून देणे. |
| 4) रोजगार हमी योजना ग्रामसभा स्वतः राबवेल यासाठी प्रयत्न करणे. | वनहक्क च्या कलम ३(१)(e) नुसार रोजगार हमी यंत्रणा घोषित करणे. |

| 5) ग्रामसभेची फसवणूक टाळणे | 1) गौण वणोपजाची खरेदी ग्रामसभेतच करणे व ग्रामसभेतर्फे त्याची विक्री करणे.<br>2) गौण उपजांची मूल्यसंवर्धन व विक्री साखळी तयार करणे.<br>3) तेंदु व बांबू प्रक्रिया स्वतः ग्रामसभे मार्फत करणे.<br>4) गावात नियम तयार करणे,उदा,(ग्रामसभेचे , जंगलाचे, गौणउपज वापराचे, आर्थिक व्यवहार, निस्तार काढण्याचे ,इत्यादी) |
|---|---|

## 2.2 सामुहिक वनसंपत्ती क्षेत्राचा तपशील

### गावाच्या गावहद्दी येणाऱ्या वनक्षेत्राची माहिती खालील प्रमाणे-

A) **कंपार्टमेंट नंबर तपशील** :- 454, 515, 555, 465

B) **सर्व्हे नंबर तपशील** :- 1, 9, 24, 40, 42, 62, 131, 133, 139, 142, 144, 145, 165, 171, 177, 224, 226, 227, 229, 234, 12, 15, 21, 39, 42, 43, 44, 46/1, 51, 54, 70, 83, 89, 90, 141, 143, 152, 168, 175, 176, 184, 202, 205, 208, 230, 231, 237.

C) **वनक्षेत्राच्या चतु:सीमा ची माहिती** -

**पूर्व**- काकडवेली, राजोली

**पश्चिम**- मिचगाव, परसवाडी

**उत्तर**– नवरगाव, यरंडी

**दक्षिण**- कनाळगाव (रिठी )



## 2.3 सीमा व हद्दीची स्थिती

1) पुर्व सीमा, 20 ते 25 मीटर अंतरावर लाकडी मुनारे व दगळी मुनारेआणि काही ठीकाणी गोटे गाढलेले आहेत,
2) पश्चिम सीमा 20 ते 25 मीटरवर लाकडी मुनारे, दगळी मुनारे आहेत,
3) उत्तर सीमा लाकडी मुनारे दगडी मुनारे व काही ठिकाणी गोटे गाढलेले आहेत,
4) दक्षिण सीमा, ही सीमा पुर्णतः शेतीतून असुन काही ठिकाणी लाकडी मुनारे व काही ठिकाणी सर्वेरचे गोटे आहेत,आणि सीमाचे चारही बाजू पुर्ण साफ केलेले आहेत,

## 2.4 समुदायीक वन हक्क प्राप्त जंगलावरील सद्यस्थितीतील अडचणी व धोके

1) **आंतरिक धोके** :- वणवा, वृक्षतोड, अतिक्रमण,बिमारी, हवामान बदल
2) **बाह्य धोके**:- वणवा, वृक्षतोड,चोरी,

## 2.5 जमिनीचा वापर तक्ता:

| जमिनीचा वापर | क्षेत्रफळ (हे) |
|---|---|
| डोंगर व जंगल | 250 |
| जंगल | 100 |
| कठाणी नदी | 10 |

| | |
|---|---|
| मळेखट | 5 |
| पडीक जमीन | 20 |
| गावठाण | 10 |
| नवा तलाव, सिंदेबोडी, माराई बोडी, टोल्याची बोडी | 10 |
| शेती | 250 |
| काकडवेली नाला | 5 |
| कठाणी नदी | 10 |
| टोल्याची बोडी | 1 |
| माराईबोडी | 1 |
| सिंदेबोडी | 3 |
| नवातलाव | 5 |
| जलसाठ्या मध्ये ग्रामसभेचे दोन मोठे तलाव व दोन लहान बोडी आहेत व खाजगी बोड्या आहेत. | 15 |

## 2.6 भूभाग/जलभाग यादी

| तुकडा क्रमांक | भुदृश्य प्रकार | भूरचना |
|---|---|---|
| 19 | ३. खूप कमी वृक्ष डोंगराळ (मिश्र) | उभा चढ |
| 18 | १६. खूप कमी वृक्ष डोंगराळ (गवत) | कमी चढ |
| 17 | १०. दाट वृक्ष डोंगराळ (मिश्र) | उभा चढ |
| 16 | २५. मध्यम वृक्ष डोंगराळ (बांबू) | उभा चढ |
| 15 | ९. मध्यम वृक्ष डोंगराळ (मिश्र) | मध्यम चढ |
| 14 | २१.विरळ वृक्ष डोंगराळ (बांबू) | मध्यम चढ |
| 13 | ६.विरळ वृक्ष डोंगराळ (मिश्र) | उभा चढ |
| 12 | २७ . दाट वृक्ष डोंगराळ (बांबू) | मध्यम चढ |
| 11 | ६.विरळ वृक्ष डोंगराळ (मिश्र) | उभा चढ |
| 10 | ७. मध्यम वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 9 | ४. विरळ वृक्ष मैदानी (मिश्र) | उंचसखल |
| 8 | १२. खूप कमी वृक्ष मैदानी (गवत) | सपाट |
| 7 | १२. खूप कमी वृक्ष मैदानी (गवत) | सपाट |
| 6 | ५.विरळ वृक्ष खडकाळ (मिश्र) | कमी चढ |
| 5 | १८. विरळ वृक्ष मैदानी (गवत) | मध्यम चढ |
| 4 | १. खूप कमी वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 3 | ४. विरळ वृक्ष मैदानी (मिश्र) | उंचसखल |
| 1 | १२. खूप कमी वृक्ष मैदानी (गवत) | कमी चढ |
| 2 | १८. विरळ वृक्ष मैदानी (गवत) | सपाट |

## 2.7 ग्रामसभेद्वारा सीमांकन केलेला नकाशा – परिशिष्ट 1

## 2.8 वनक्षेत्रातील टापू (पारंपारिक/विशिष्ट नावाने ओळखल्या जाणारी जागा) माहिती

1) सिंदेबोडी भटाळ 2) आ्बेकोडंर 3) लयापाडी 4) कुंभार खण 5) लालमाती भडक 6)मुरुम खदान भटाळ 7)जाकाई डोंगर 8)यरंडी डोंगर 9)मोठ्या देवाची हुळकी 10)रावनाचा टेकळ 11) मळेखट 12) बलकिदेव भटाळ 13)जाकाई डोंगर 14)कोवान मेटा 15)गोसाईदेव हुळकी 16) बोगान मेटा 17) सागवन मेटा 18) यरंडी रस्ता 19) कोवान मेटा

## 2.9 वृक्षांचा विविध भूभागावर संख्यात्मक अंदाज

| **भुदृश्य प्रकार** | **१. खूप कमी वृक्ष मैदानी (मिश्र)** | | |
|---|---|---|---|
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | काक ई | 10.0384863 | 0.049927335 |
| 2 | खैर | 10.0384863 | 0.049927335 |
| 3 | गराडी | 40.1539452 | 1.683549732 |
| 4 | धामण | 10.0384863 | 0.062628849 |
| 5 | धावडा | 10.0384863 | 0.127813977 |
| 6 | बेहेडा | 40.1539452 | 1.727485787 |
| 7 | मोह | 10.0384863 | 0.720950716 |
| 8 | मोहू | 20.0769726 | 1.616926696 |
| 9 | येन | 20.0769726 | 1.094806599 |
| 10 | शेहना | 10.0384863 | 0.127813977 |
| 11 | साग | 20.0769726 | 0.773594098 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **200.769726** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **१०. दाट वृक्ष डोंगराळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कळंब | 40.071725 | 3.895658681 |
| 2 | कस ई | 13.3572417 | 0.959299307 |
| 3 | गराडी | 160.2869 | 4.342091599 |

| | | | |
|---|---|---|---|
| 4 | घोघर | 13.3572417 | 0.06643347 |
| 5 | तेंदू | 13.3572417 | 2.234821931 |
| 6 | धावडा | 13.3572417 | 0.59790123 |
| 7 | पारड | 13.3572417 | 0.215244443 |
| 8 | बांबू | 13.3572417 | 0 |
| 9 | बिजा | 26.7144834 | 2.81146445 |
| 10 | बिवला | 13.3572417 | 2.721114931 |
| 11 | बेहेडा | 13.3572417 | 0.959299307 |
| 12 | भेरा | 13.3572417 | 0.130209601 |
| 13 | येन | 40.071725 | 2.388947581 |
| 14 | शेहना | 26.7144834 | 5.596355513 |
| 15 | साग | 66.7862084 | 4.833699277 |
| 16 | साल ई | 13.3572417 | 2.39160492 |
| 17 | सुर्या | 26.7144834 | 0.287098884 |
| 18 | हिरडा | 13.3572417 | 0.449090257 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **534.2896673** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **१२. खूप कमी वृक्ष मैदानी (गवत)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | आवळा | 15.9296515 | 0.35652414 |
| 2 | कंळब | 7.96482574 | 0.513394762 |
| 3 | कळंब | 7.96482574 | 0.35652414 |
| 4 | कुळा | 7.96482574 | 0.039613793 |
| 5 | कोजोब | 7.96482574 | 0.457935451 |
| 6 | खैर | 7.96482574 | 0.077643035 |
| 7 | गराडी | 39.8241287 | 1.250211318 |
| 8 | चार | 15.9296515 | 0.456350899 |
| 9 | तेंदू | 15.9296515 | 0.781184005 |
| 10 | धावडा | 7.96482574 | 0.457935451 |
| 11 | पळस | 7.96482574 | 0.19173076 |
| 12 | पारड | 15.9296515 | 0.411983451 |
| 13 | बाहवा | 7.96482574 | 0.838227867 |
| 14 | बिजा | 15.9296515 | 1.156152327 |
| 15 | बेल | 7.96482574 | 0.35652414 |
| 16 | बेहेडा | 15.9296515 | 1.123447179 |
| 17 | मोव ई | 7.96482574 | 0.12834869 |
| 18 | मोह | 7.96482574 | 0.572023176 |

| | | | |
|---|---|---|---|
| 19 | मोहू | 23.8944772 | 2.177174082 |
| 20 | येन | 31.8593029 | 1.62733463 |
| 21 | रोहन | 15.9296515 | 0.459520003 |
| 22 | शिवन | 7.96482574 | 0.101411311 |
| 23 | साग | 15.9296515 | 1.253000129 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **318.5930295** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **१४. खूप कमी वृक्ष खडकाळ (गवत)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | काकयी | 20.1690644 | 0.125832247 |
| 2 | कुळा | 20.1690644 | 0.117004729 |
| 3 | गराडी | 60.5071931 | 1.51078946 |
| 4 | घोटी | 20.1690644 | 0.231762454 |
| 5 | चार | 60.5071931 | 0.395793776 |
| 6 | तेंदू | 20.1690644 | 0.976483913 |
| 7 | धावडा | 40.3381287 | 1.917015756 |
| 8 | पारड | 20.1690644 | 0.208008408 |
| 9 | बाहवा | 20.1690644 | 0.369792725 |
| 10 | भेरा | 20.1690644 | 0.786451541 |
| 11 | मोवयी | 20.1690644 | 2.049428516 |
| 12 | मोहू | 60.5071931 | 4.451315723 |
| 13 | येन | 20.1690644 | 0.339618665 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **403.3812872** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **१८. विरळ वृक्ष मैदानी (गवत)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कंळब | 8.1898405 | 0.625918418 |
| 2 | कुळा | 16.379681 | 0.098606265 |
| 3 | कोजोब | 32.759362 | 5.057725828 |
| 4 | गराडी | 32.759362 | 1.383876686 |
| 5 | चार | 16.379681 | 0.144031623 |
| 6 | जामरून | 8.1898405 | 0.104276288 |
| 7 | तेंदू | 24.5695215 | 0.48710061 |
| 8 | धावडा | 16.379681 | 0.762520356 |
| 9 | पारड | 8.1898405 | 0.301358472 |

| | | | |
|---|---|---|---|
| 10 | बिवला | 8.1898405 | 0.14396645 |
| 11 | बेल | 16.379681 | 0.105905605 |
| 12 | बेहेडा | 8.1898405 | 0.876963582 |
| 13 | मोहू | 40.9492025 | 2.764755429 |
| 14 | येन | 32.759362 | 1.263437574 |
| 15 | लोकडी | 8.1898405 | 0.131974677 |
| 16 | शिवन | 8.1898405 | 0.266947297 |
| 17 | साग | 32.759362 | 1.487305729 |
| 18 | हिवर | 8.1898405 | 0.089221399 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **327.5936201** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **२१.विरळ वृक्ष डोंगराळ (बांबू)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कोजोब | 12.6296867 | 0.814081211 |
| 2 | गराडी | 75.77812 | 2.206059578 |
| 3 | धावळा | 37.88906 | 6.015155614 |
| 4 | भेरा | 12.6296867 | 1.216096624 |
| 5 | शेहना | 25.2593733 | 2.645763935 |
| 6 | साग | 75.77812 | 9.120724678 |
| 7 | सुर्या | 12.6296867 | 0.565334174 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **252.5937335** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **४. विरळ वृक्ष  मैदानी (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कोजोब | 35.4658978 | 7.016909737 |
| 2 | गराडी | 53.1988466 | 3.196239428 |
| 3 | घोगर | 17.7329489 | 0.596208017 |
| 4 | धामन | 17.7329489 | 1.019550987 |
| 5 | धावडा | 70.9317955 | 4.060564659 |
| 6 | पारड | 17.7329489 | 1.866236929 |
| 7 | बांबू | 35.4658978 | 0 |
| 8 | मोव ई | 17.7329489 | 1.019550987 |
| 9 | येन | 17.7329489 | 7.143912628 |
| 10 | साग | 53.1988466 | 5.581071495 |
| 11 | सुर्या | 17.7329489 | 0.79376807 |

| वृक्ष संख्या | प्रती हेक्टर | 354.6589777 | |
|---|---|---|---|
| | | | |
| भुदृश्य प्रकार | २५. मध्यम वृक्ष डोंगराळ (बांबू) | | |
| क्र. | वृक्ष | वृक्ष संख्या प्रती हेक्टर | खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.) |
| 1 | कंळब | 11.8525472 | 0.398500199 |
| 2 | कोजोब | 23.7050944 | 1.603432754 |
| 3 | गराडी | 71.1152832 | 2.84137716 |
| 4 | धावळा | 11.8525472 | 0.68145892 |
| 5 | बांबू | 23.7050944 | 0 |
| 6 | साग | 71.1152832 | 4.272676692 |
| 7 | सुर्या | 23.7050944 | 0.530547602 |
| वृक्ष संख्या | प्रती हेक्टर | 237.050944 | |
| | | | |
| भुदृश्य प्रकार | २७ . दाट वृक्ष डोंगराळ (बांबू) | | |
| क्र. | वृक्ष | वृक्ष संख्या प्रती हेक्टर | खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.) |
| 1 | कंळब | 11.8525472 | 0.398500199 |
| 2 | कोजोब | 23.7050944 | 1.603432754 |
| 3 | गराडी | 71.1152832 | 2.84137716 |
| 4 | धावळा | 11.8525472 | 0.68145892 |
| 5 | बांबू | 23.7050944 | 0 |
| 6 | साग | 71.1152832 | 4.272676692 |
| 7 | सुर्या | 23.7050944 | 0.530547602 |
| वृक्ष संख्या | प्रती हेक्टर | 237.050944 | |
| | | | |
| भुदृश्य प्रकार | ४. विरळ वृक्ष  मैदानी (मिश्र) | | |
| क्र. | वृक्ष | वृक्ष संख्या प्रती हेक्टर | खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.) |
| 1 | आवळा | 9.40038727 | 0.605927831 |
| 2 | कस ई | 9.40038727 | 0.398640668 |
| 3 | कुळा | 9.40038727 | 0.067325315 |
| 4 | गराडी | 122.205035 | 3.91391976 |
| 5 | चार | 18.8007745 | 0.272069077 |
| 6 | तेंदू | 18.8007745 | 0.704746432 |
| 7 | बांबू | 9.40038727 | 0 |

| | | | |
|---|---|---|---|
| 8 | बाहवा | 9.40038727 | 0.091637234 |
| 9 | बिवला | 9.40038727 | 0.478757792 |
| 10 | बेल | 9.40038727 | 0.287553899 |
| 11 | बेहेडा | 18.8007745 | 0.575107798 |
| 12 | भेरा | 9.40038727 | 0.151481958 |
| 13 | मोहु | 9.40038727 | 0.905151451 |
| 14 | मोहू | 9.40038727 | 0.675123293 |
| 15 | येन | 18.8007745 | 0.606975114 |
| 16 | रोहन | 9.40038727 | 0.269301258 |
| 17 | साग | 9.40038727 | 0.234591318 |
| 18 | सागवन | 28.2011618 | 0.258753626 |
| 19 | सुर्या | 18.8007745 | 0.094330246 |
| 20 | हिरडा | 9.40038727 | 0.420783216 |
| 21 | हिवर | 9.40038727 | 0.345902505 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **376.0154909** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **५.विरळ वृक्ष खडकाळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | आवळा | 17.8167331 | 0.510411805 |
| 2 | कंळब | 17.8167331 | 0.797518445 |
| 3 | कुळा | 17.8167331 | 0.127602951 |
| 4 | गराडी | 53.4501992 | 1.141337508 |
| 5 | गोंगल | 17.8167331 | 0.510411805 |
| 6 | तेंदू | 17.8167331 | 1.024368136 |
| 7 | धावडा | 17.8167331 | 0.413433562 |
| 8 | बाहवा | 17.8167331 | 0.226849691 |
| 9 | बेहेडा | 17.8167331 | 1.148426561 |
| 10 | भेरा | 35.6334661 | 0.638014756 |
| 11 | मोहू | 17.8167331 | 2.04164722 |
| 12 | येन | 17.8167331 | 1.279574039 |
| 13 | रोहन | 17.8167331 | 0.173681795 |
| 14 | शिवन | 17.8167331 | 0.694727179 |
| 15 | साग | 35.6334661 | 3.207796413 |
| 16 | सुर्या | 17.8167331 | 0.28710664 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **356.3346615** | |
| | | | |

| **भुदृश्य प्रकार** | **६.विरळ वृक्ष  डोंगराळ (मिश्र)** | | |
|---|---|---|---|
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | आवळा | 6.90525921 | 0.351681964 |
| 2 | कंळब | 6.90525921 | 0.445097485 |
| 3 | कुळा | 20.7157776 | 0.280741118 |
| 4 | कोजोब | 6.90525921 | 0.445097485 |
| 5 | खैर | 6.90525921 | 0.269256503 |
| 6 | गराडी | 41.4315553 | 1.399859066 |
| 7 | घोघर | 13.8105184 | 0.122264433 |
| 8 | घोटी | 6.90525921 | 0.067314126 |
| 9 | चार | 6.90525921 | 0.111274371 |
| 10 | जामरूध | 6.90525921 | 0.445097485 |
| 11 | तेंदू | 13.8105184 | 0.629181013 |
| 12 | धावडा | 13.8105184 | 0.343439418 |
| 13 | धावळा | 13.8105184 | 0.358550752 |
| 14 | भेरा | 6.90525921 | 0.111274371 |
| 15 | मोका | 6.90525921 | 0.309095476 |
| 16 | मोव ई | 41.4315553 | 2.25296258 |
| 17 | मोहु | 27.6210368 | 2.946984955 |
| 18 | साग | 13.8105184 | 0.892942486 |
| 19 | सावरून | 6.90525921 | 0.664898712 |
| 20 | सुर्या | 6.90525921 | 0.087920491 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **276.2103683** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **७. मध्यम वृक्ष  मैदानी (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कस ई | 27.1362228 | 0.456935811 |
| 2 | कोजोब | 54.2724456 | 3.509076999 |
| 3 | गराडी | 135.681114 | 6.865266212 |
| 4 | तेंदू | 27.1362228 | 0.1349645 |
| 5 | धावडा | 27.1362228 | 1.56018962 |
| 6 | धावळा | 27.1362228 | 0.677197875 |
| 7 | पारड | 27.1362228 | 0.26453042 |
| 8 | बिवला | 54.2724456 | 10.6352026 |
| 9 | भेरा | 27.1362228 | 0.43728498 |

| 10 | मोव ई | 27.1362228 | 1.63447408 |
|---|---|---|---|
| 11 | मोह | 27.1362228 | 3.109582079 |
| 12 | येन | 27.1362228 | 2.855848819 |
| 13 | साग | 54.2724456 | 6.181374098 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **542.7244564** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **९. मध्यम वृक्ष डोंगराळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | गराडी | 129.869076 | 4.059193206 |
| 2 | घोटी | 32.4672689 | 1.265994953 |
| 3 | चिचवा | 32.4672689 | 3.416894542 |
| 4 | तेंदु | 32.4672689 | 0.050639798 |
| 5 | धावडा | 32.4672689 | 1.453310533 |
| 6 | पारड | 32.4672689 | 3.720474965 |
| 7 | बांबू | 97.4018068 | 0 |
| 8 | मोव ई | 32.4672689 | 1.453310533 |
| 9 | येन | 32.4672689 | 0.09327024 |
| 10 | साग | 64.9345379 | 2.648254749 |
| वृक्ष संख्या | प्रती हेक्टर | 519.476303 | |

## 3. वनहक्क अंतर्गत मिळणाऱ्या लाभांची गरज आणि वापर तपशील -

### 3.1 वनस्पती वापर तपशील

शीट 1 (अन्न)

| क्र. | वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण (%) | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |

| 1 | कुळा | फुल,शेंगा | जून ते जुलै | 70 | 75 | 25 |
|---|---|---|---|---|---|---|
| 2 | पिंपळ बार | फुल | जून ते जुलै | 30 | 75 | 25 |
| 3 | सफेद मुसळी | पान | जुलै अगस्त | 40 | 99 | 1 |
| 4 | कळू कांदे | कांदे | डिसेंबर ते जानेवारी | 26 | 99 | 1 |
| 5 | तरोटा | पान | जुलै | 34 | 25 | 75 |
| 6 | कडू भाजी | पान | मे ते जून | 32 | 99 | 1 |
| 7 | चिपळी भाजी | पान | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | 3 | 99 | 1 |
| 8 | शेरडीरा | देठ | जुलै ते ऑगष्ट | 8 | 99 | 1 |
| 9 | हळदुली | कांदे | डिसेंबर ते जानेवारी | 23 | 99 | 1 |
| 10 | पार्सेला | फळ | जानेवारी ते फेब्रुवारी | 5 | 99 | 1 |
| 11 | बोराभाजी | पान | जुलै ते ऑगष्ट | 76 | 99 | 1 |
| 12 | आंबा | फळ | मे ते जून | 98 | 25 | 75 |
| 13 | आवळा | फळ | जानेवारी ते एप्रिल | 51 | 99 | 1 |
| 14 | उमरून | फळ | मे ते जून | 12 | 25 | 75 |
| 15 | कचर कांदे | कांदे | एप्रिल ते मे | 11 | 99 | 1 |
| 16 | कवठ | फळ | एप्रिल ते मे | 6 | 99 | 1 |
| 17 | काटवल | फळ | जुलै ते सप्टेंबर | 90 | 1 | 99 |
| 18 | काटा कोहळा | फळ | नोव्हेंबर ते जानेवारी | 12 | 1 | 99 |
| 19 | काळी मुसळी | पान | जुलै ते ऑगष्ट | 8 | 99 | 1 |
| 20 | कोयार भाजी | पान | जून | 91 | 99 | 1 |
| 21 | कोजूब | फळ | जून ते जुलै | 70 | 99 | 1 |
| 22 | खोबर वेल | मूळ | नोव्हेबर ते जानेवारी | 25 | 99 | 1 |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 23 | गवतीचाय | पान | बाराही महिने | 2 | 1 | 99 |
| 24 | चिंच | फळ | मे ते जून | 80 | 25 | 75 |
| 25 | बोदेले | फळ | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | 80 | 70 | 30 |
| 26 | जांभूळ | फळ | जून ते जुलै | 80 | 70 | 30 |
| 27 | टेंभरून | फळ | एप्रिल ते मे | 90 | 99 | 1 |
| 28 | धोबे | पान | ऑगष्ट ते सप्टेंबर | 80 | 1 | 99 |
| 29 | पातुर भाजी | पान | जून ते जुलै | 80 | 99 | 1 |
| 30 | बेहळा | फळ | डिसेंबर ते जानेवारी | 17 | 99 | 1 |
| 31 | मटारु | फळ,कांदे | नोव्हेंबर ते डिसेंबर | 98 | 1 | 99 |
| 32 | बांबू | कोंब | ऑगष्ट ते सप्टेंबर | 98 | 99 | 1 |



## 3.2 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 2 (चारा)

| क्र. | वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी वापर केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | कार जाळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 2 | डोगाल जाळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 3 | बरटूम | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 4 | पुतेर जाळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 5 | जुनाक जप्पी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |

| 6 | हिकुम जप्पी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
|---|---|---|---|---|---|
| 7 | पर्सेला | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 8 | बिलायकोजी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 9 | दुधूम | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 10 | बोराभाजी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 11 | कोरहुची | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 12 | उतरण वेल | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 13 | उमरून | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 14 | उरसुळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 15 | एरोनी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 16 | कसई | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 17 | काटा भाजी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 18 | कुसार्या गवत | पान | जुलै ते ऑगष्ट | 90 | 10 |
| 19 | खोबरवेल | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 20 | गराडी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 21 | चिंच | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 22 | चिकना | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 23 | जंगली तूर | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 24 | जंगली मुंग | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 25 | बोंगा भाजी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 26 | रांजी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |



## 3.3 वनस्पती वापर तपशील
## शीट 3 (जाळाऊ लाकूड)

| क्र. | उत्पादन<br>वनउपज | हंगाम आणि | प्रति हंगाम सरासरी<br>गोळा केलेले प्रमाण |
|---|---|---|---|

| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | कालावधी | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
|---|---|---|---|---|---|
| 1 | मोह | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 2 | गराडी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 3 | येन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 4 | चिंच | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 5 | रोहन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 6 | झिलबुली | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 7 | सिहाना | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 8 | भेरा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 9 | बिजा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 10 | आवळा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 11 | चारा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 12 | पळस | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 13 | धावळा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 14 | कुळा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |

## 3.4 वनस्पती वापर तपशील

## पत्रक 4 (घर बांधणी)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | साग | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 2 | बांबू | ओला बांबू | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 3 | येन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |

| 4 | बिजा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
|---|---|---|---|---|---|
| 5 | गराडी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 6 | सूर्या | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 7 | मोवई | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 8 | अंजन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 9 | रोहणी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 10 | कारारुख | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 11 | हळदु | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |



### 3.5 वनस्पती वापर तपशील
### पत्रक 5 (कृषी अवजारे)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | साग | नांगर,दांडी | मे ते जून | 10 | 95 | 5 |
| 2 | बोरी | नांगर | मे ते जून | 3 | 95 | 5 |
| 3 | भेरा | नांगर,दांडी | मे ते जून | 25 | 95 | 5 |
| 4 | कोजूब | नांगर | मे ते जून | 36 | 95 | 5 |
| 5 | करारुख | पट्टा,फन,वकर | मे ते जून | 11 | 95 | 5 |
| 6 | अंजन | नांगर, दांडी | मे ते जून | 40 | 95 | 5 |

| 7 | बिजा | नांगर, दांडी | मे ते जून | 5 | 95 | 5 |
|---|---|---|---|---|---|---|
| 8 | धावळा | दांडी | मे ते जून | 40 | 95 | 5 |

## 3.6 वनस्पती वापर तपशील
## शीट 6 (कुंपण घालणे)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | बांबू | ओला/सुका बांबू | मे ते जून | 97 | 95 | 5 |
| 2 | साग | वाळलेला लाकूड | मे ते जून | 50 | 95 | 5 |
| 3 | गराडी | वाळलेला लाकूड | मे ते जून | 55 | 95 | 5 |
| 4 | येन | वाळलेला लाकूड | मे ते जून | 45 | 95 | 5 |
| 5 | बिजा | वाळलेला लाकूड | मे ते जून | 44 | 95 | 5 |
| 6 | पळस | वाळलेला लाकूड | मे ते जून | 67 | 95 | 5 |
| 7 | रोहणी | वाळलेला लाकूड | मे ते जून | 70 | 95 | 5 |
| 8 | धावळा | वाळलेला लाकूड | मे ते जून | 30 | 95 | 5 |



## 3.7 वनस्पती वापर तपशील
## पत्रक 7 (संस्कृती)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | कारण |
|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | |
| 1 | मोह | फांदी,पान | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 2 | बांबू | बांबू | मार्च ते मे | लग्नासाठी |

| 3 | साग | वाळलेला लाकूड | मार्च ते मे | लग्नासाठी |
|---|---|---|---|---|
| 4 | जांभूळ | फांदी | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 5 | कोजूब | फांदी | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 6 | वराकली | फळ | मार्च ते मे | पूजेसाठी |
| 7 | कुळा | पान,शेंग | ऑगष्ट | पोळा सणाच्या वेळी |
| 8 | शिंदी | पान | मार्च ते मे | मोहूर/बाशिंग बनविण्यासाठी |
| 9 | माहूर | पान | मार्च ते मे | पत्राली |
| 10 | मोहई | वाळलेला लाकूड | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 11 | येन | वाळलेला लाकूड | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 12 | शतावरी | पान | ऑगष्ट | पोळा सणाच्या वेळी |
| 13 | बेल | पान | हमेशा | पूजेसाठी |
| 14 | बोर | फळ | जानेवारी | वान वाटणी |
| 15 | भेरा | पान | ऑगष्ट | पोळ्यासाठी |
| 16 | तुळशी | पान | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 17 | दुर्वा | पान | बाराही महिने | पूजेसाठी |
| 18 | पळस | पान | मार्च ते मे | पत्रावळी |
| 19 | परसोड | फळ | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | दिवाळी साठी |
| 20 | कडूनिंब | पान | मार्च | पूजेसाठी |



## 3.8 वनस्पती वापर तपशील

## पत्रक 8 (वन औषधी)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | केहकामाटी | कांदा | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 2 | हादेमाटी | पंचांग | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 3 | नांगेलमाटी | पंचांग | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 4 | कांदाळ उल्ली | पंचांग | जून ते जुलै | 95 | 5 |
| 5 | कर्वूलमाटी | कांदा | जून ते जुलै | 95 | 5 |
| 6 | हिर माटी | पंचांग | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 7 | नसतोंडा | पंचांग | जून ते मार्च | 95 | 5 |
| 8 | अदरवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 9 | पार्सेला | पंचांग | ऑगष्ट | 95 | 5 |
| 10 | कटूल कोसा | पंचांग | जून ते मार्च | 95 | 5 |
| 11 | दुधूम | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 12 | नयनेंडी | पंचांग | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 13 | मस्या | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 14 | डोकेमरा | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 15 | हिवीर | मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 16 | मूसतुमीर | फळ | डिसेम्बर | 95 | 5 |
| 17 | तिरका | फळ | डिसेंबर ते मार्च | 95 | 5 |
| 18 | सिरेल | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 19 | चंद्रीमरा | साल,मूळ | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 20 | नाचुम | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 21 | कोरकोट जपी | पान,मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 22 | बोराभाजी | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 23 | अडूळसा | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 5 | 95 |
| 24 | झरका | पंचांग | जून ते जुलै | 95 | 5 |
| 25 | आघाडा | पंचांग | जून ते जानेवारी | 95 | 5 |
| 26 | अंजन | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 27 | आटइ | साल | बाराही महिने | 95 | 5 |

| 28 | आपटा | साल | बाराही महिने | 95 | 5 |
|---|---|---|---|---|---|
| 29 | आंबा | पान,साल | बाराही महिने | 5 | 95 |
| 30 | उतरणवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 31 | उमरून | पंचांग | बाराही महिने | 50 | 50 |
| 32 | उरसुळी | पंचांग | जून ते मार्च | 50 | 50 |
| 33 | कचर कांदे | कांदा | नोव्हेंबर ते जून | 95 | 5 |
| 34 | कडूनिम | पंचांग | बाराही महिने | 50 | 50 |
| 35 | करकरी (पोरा पुंगार) | पंचांग | ऑगष्ट | 50 | 50 |
| 36 | रक्त रोहणी | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 37 | कळंब | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 38 | कळूकांदे | कांदा | डिसेम्बर ते मार्च | 95 | 5 |
| 39 | कडूभाजी | पंचांग | डिसेम्बर ते मार्च | 95 | 5 |
| 40 | कवसकुरी | फळ | नोव्हेंबर ते मे | 95 | 5 |
| 41 | कसई | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 42 | कुकुरडा | पंचांग | ऑगष्ट ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 43 | कुळा | पंचांग | बाराही महिने | 45 | 55 |
| 44 | कोयार भाजी | मूळ,पान | जून | 95 | 5 |
| 45 | करू | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 46 | खैर | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 47 | कोजूब | साल,मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 48 | खोबरवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 49 | गराडी | साल,पान | बाराही महिने | 95 | 5 |
| 50 | गवती चाय | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 51 | गुळवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 52 | घंटा | फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 53 | घोटी | फळ | बाराही महिने | 95 | 5 |

| 54 | चिकना | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
|---|---|---|---|---|---|
| 55 | भूतगांजा | बीज | जून नोव्हेंबर | 95 | 5 |
| 56 | जोन्दुरली | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 57 | डिकेमाली | डींक | डिसेम्बर ते मार्च | 95 | 5 |
| 58 | देन्डोरा | पंचांग | ऑगष्ट ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 59 | डोर्ली वांगा | पंचांग | नोव्हेंबर ते मार्च | 95 | 5 |
| 60 | तुळशी | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 61 | तेंदू | पान | बाराही महिने | 95 | 5 |
| 62 | तेल दोडका | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 63 | दुर्वा | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 64 | देव तरोटा | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 65 | धावळा | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 66 | धोबा | पान | बाराही महिने | 95 | 5 |
| 67 | निर्गुंडी | फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 68 | पडोरा | फळ | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 69 | परसोड | बीज | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 70 | पळस | मूळ,बी,साल | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 71 | पळसवेल | मूळ | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 72 | पातुरवेल | मूळ | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 73 | बहावा | फुल | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 74 | बेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 75 | बिबा | फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 76 | बेसवेल | पंचांग | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 77 | बोर | साल,फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 78 | बोरू | मूळ | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 79 | भुईआवळा | पंचांग | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |

| 80 | भुईचक्र | पंचांग | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
|---|---|---|---|---|---|
| 81 | भुईनिंब | पंचांग | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 82 | भूतगांजा | पंचांग | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 83 | माका | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 84 | भेरा | पान | बाराही महिने | 95 | 5 |
| 85 | मालकांगुनी | पंचांग | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 86 | माहूर | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 87 | मुंगना | पंचांग | बाराही महिने | 5 | 95 |
| 88 | सात्या | पंचांग | ऑगष्ट ते ऑक्टोंबर | 95 | 5 |
| 89 | रान केळी | पान,फळ | ऑगष्ट ते ऑक्टोंबर | 95 | 5 |
| 90 | रानझेंडू | फळ | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 91 | रानभेंडी | मूळ | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 92 | रिठा | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 93 | रान हळद | कांदा | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 94 | रुई | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 95 | रोहन | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 96 | लाजाळू | मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 97 | लालगुंजा | पंचांग | जून ते मार्च | 95 | 5 |
| 98 | लेन्जा | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 99 | लोगडी | फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 100 | वड | फळ,साल,मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 101 | वर | पंचांग | जुलै ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 102 | वराकली | पंचांग | जानेवारी ते मार्च | 95 | 5 |
| 103 | वाघनकी | पंचांग | डिसेम्बर ते मे | 95 | 5 |

| 104 | शंखपुष्पी | पंचांग | बाराही महिने | 2 | 98 |
|---|---|---|---|---|---|
| 105 | सफेद मुसळी | पंचांग | जून ते सप्टेंबर | 95 | 5 |

## 3.9 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 9 (इतर)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |

## 3.10 समुदायाने विक्रीसाठी जमा केलेल्या वनउपजचे विश्लेषण

| क्र. | वनउपजाचे नाव | वनउपज संग्रहाचे हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | वनउपज विक्रीचे हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | वनउपजाचे सरासरी बाजार किमत | मूल्य वृद्धी | विक्रीची जागा | समुदायीक क्षेत्रातून गोला केलेले प्रमाण | इतर वन क्षेत्रातून गोला केलेले प्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | मोह | फेब्रुवारी ते मार्च | | एप्रिल ते मे | ५ क्विंटल | २५ | | फिरते व्यापारी | ५०% | ५०% |
| 2 | चार | एप्रिल | | मे | २५ किलो | १९० | | फिरते व्यापारी | १००% | |
| 3 | तेंदू | मे | | मे | १०० मुडके एक व्यक्ती | | | फिरते व्यापारी | ९०% | 10% |
| 4 | तरोटा | नोव्हेंबर ते डिसेम्बर | | डिसेम्बर | 6 किलो | २५ | | फिरते व्यापारी | ७०% | ४०% |
| 5 | चिंच | मे | | जून | 20 किलो | 35 | | फिरते व्यापारी | ५०% | ५०% |
| 6 | टोरी | जून | | जून | ४० किलो | २५ | | फिरते व्यापारी | ५०% | ५०% |
| 7 | बेहडा | जानेवारी ते मार्च | | मार्च | ४० किलो | 7 | | फिरते व्यापारी | १००% | |

## 4. ग्रामसभा सक्षमीकरण

4. ग्रामसभा सक्षमीकरण

